माहिती तंत्रज्ञानविषयक धोरण
राबविण्यासाठी तसेच संगणकीकरणाचा
कृती कार्यक्रम राबविण्यासाठी उच्चाधिकार
समितीचे पुनर्गठन करण्याबाबत

---

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: सीओएम-१०९८/प्र.क्र.२१३/९८/३९,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ डिसेंबर, १९९८

वाचा : सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. सीओएम-१०९८/प्र.क्र.१०/९८/१८-अ, दि. १६ फेब्रुवारी, १९९८.

**शासन निर्णय :**

या विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासनामध्ये माहिती तंत्रज्ञानाचा व संगणकाचा वापर वाढविण्यासाठी शासनाने संगणकीकरणाचे जे धोरण ठरविले आहे, त्याच्या अंमलबजावणीसाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली एक उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात आली होती. तदनंतर दिनांक १७ ऑगस्ट, १९९८ रोजी मा. मुख्य मंत्री महोदयांनी राज्याचे माहिती तंत्रज्ञानविषयक धोरण जाहीर केले आहे.

२. सदर धोरणाच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने उपरोक्त शासन निर्णयान्वये गठित केलेल्या उच्चाधिकार समितीमध्ये काही फेरबदल करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमीत करुन खाली नमूद केल्याप्रमाणे उच्चाधिकार समितीचे पुनर्गठन करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| मुख्य सचिव | - अध्यक्ष |
| प्रधान सचिव (वित्त) | - सदस्य |
| प्रधान सचिव (नियोजन) | - सदस्य |
| प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) | - सदस्य |
| सचिव (महसूल) | - सदस्य |
| सचिव (उद्योग) | - सदस्य |
| विकास आयुक्त (सीप्झ) | - सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | - सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लिमिटेड | - सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, सिडको लिमिटेड | - सदस्य |

..२/

| | |
|---|---|
| आयुक्त (सीमा शुल्क) | – सदस्य |
| आयुक्त (उत्पादन शुल्क) | – सदस्य |
| विकास आयुक्त (उद्योग) | – सदस्य |
| इलेक्ट्रॉनिक तथा कॉम्प्युटर सॉफ्टवेअर एक्सपोर्ट प्रमोशन कौन्सिल यांचे प्रतिनिधी | – सदस्य |
| संचालक, सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी पार्क ऑफ इंडिया, पुणे | - सदस्य |
| डीन, आय.आय.टी., पवई अथवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| संचालक, वर्ल्ड ट्रेड सेंटर अथवा त्यांचे प्रतिनिधी | – सदस्य |
| संचालक, नॅशनल सेंटर फॉर सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी (NCST) | - सदस्य |
| महासंचालक, नॅशनल इन्फर्मेटिक्स सेंटर, नवी दिल्ली. | – सदस्य |
| अध्यक्ष, नॅसकॉम अथवा त्यांचे प्रतिनिधी | – सदस्य |
| मॅन्युफॅक्चरर्स असोसिएशन ऑफ इन्फर्मेशन टेक्नॉलॉजीयांचे प्रतिनिधी. | - सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, विदेश संचार निगम लिमीटेड, मुंबई | - सदस्य |
| मुख्य महाव्यवस्थापक, महानगर टेलिफोन्स निगम लिमीटेड, मुंबई | - सदस्य |
| मुख्य महाव्यवस्थापक, महाराष्ट्र दूरसंचार क्षेत्र | – सदस्य |
| संचालक (माहिती तंत्रज्ञान) | – सदस्य-सचिव |

या खेरीज आवश्यकतेप्रमाणे इतर अधिकाऱ्यांना त्यांच्या विषयानुसार या समितीवर आमंत्रित म्हणून बोलाविण्याचे अधिकार अध्यक्षांना राहतील.

या उच्चाधिकार समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१. माहिती तंत्रज्ञान शाखेची व्याख्या (माहिती तंत्रज्ञान उत्पादने, माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर, माहिती तंत्रज्ञान सेवा) ठरविणे.

२. माहिती तंत्रज्ञान धोरणाचे संनियंत्रण आणि अंमलबजावणी.

३. माहिती तंत्रज्ञान धोरणाच्या अंमलबजावणीमध्ये येणाऱ्या कोणत्याही अडचणी किंवा समस्या सोडविणे.

४. उच्चाधिकार समितीकडे निर्णयार्थ विविध विभागांकडून सादर करण्यात येणाऱ्या विविध निर्णयांच्या प्रस्तावांच्या अंमलबजावणीची पध्दत ठरविणे.

३. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये जी उच्चाधिकार समिती गठित करण्यात आली होती तिची रचना शासकीय कामकाजाच्या संगणकीकरणाच्या प्रस्तावांची छाननी करणे, मान्यता देणे, अनुक्रम ठरविणे इत्यादींसाठी होती. त्यामुळे त्या समितीमध्ये शासकीय कामकाजाच्या संगणकीकरणाच्या प्रस्तावांना मान्यता देण्याबाबत प्रस्ताव सादर केले जात होते. तसेच य समितीच्या बैठका वारंवार भरविण्यात येत होत्या. परंतु, पुनर्रचित उच्चाधिकार समितीच कार्यकक्षा अधिक व्यापक असल्यामुळे या समितीसमोर शासकीय कामकाजाच संगणकीकरण करण्याच्या विविध विभागनिहाय योजना छाननी व मान्यतेसाठी साद

GR-200204171632 000-0104

करण्याऐवजी या कामासाठी या उच्चाधिकार समितीची एक कार्यकारी समिती नेमण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. उपरोक्त पुनर्रचित उच्चाधिकार समितीची खालीलप्रमाणे कार्यकारी समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | – अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग | – सदस्य |
| ३. | प्रधान सचिव (नियोजन) | – सदस्य |
| ४. | प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) | – सदस्य |
| ५. | प्रधान सचिव (महसूल) | – सदस्य |
| ६. | विकास आयुक्त (उद्योग) | – सदस्य |
| ७. | संचालक, नॅशनल सेंटर फॉर सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी (NCST) | – सदस्य |
| ८. | महासंचालक, नॅशनल इन्फर्मेटिक्स सेंटर, नवी दिल्ली. | – सदस्य |
| ९. | संचालक (माहिती तंत्रज्ञान) | – सदस्य-सचिव |

उपरोक्त प्रस्तावित करण्यात आलेल्या कार्यकारी समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१. संगणकीकरणासाठी दीर्घ मुदतीची योजना व कार्यक्रम आखणे व त्याच्या अंमलबजावणीची दिशा ठरविणे, तसेच संगणकीकरणाच्या कार्यक्रमाची घेणाऱ्या विभागाने प्राधान्याने अंमलबजावणी करावी यासाठी विभागांचा प्राधान्यक्रम ठरवून त्यासाठी वेळापत्रक ठरविणे, त्याकरिता अर्थसंकल्पिय तरतूद अभिहस्तांकित करणे, आणि संगणकीकरणाच्या प्रकल्पांना / प्रस्तावांना मान्यता देणे.

२. शासनाचे विविध विभाग व संस्था आणि दुय्यम कार्यालयांत होत असलेल्या संगणकीकरणाच्या कामाच्या प्रगतीवर देखरेख ठेवणे व येणाऱ्या अडचणी सोडविण्याकरिता आवश्यक ती कार्यवाही करणे.

३. अंमलबजावणीच्या प्रगतीचा नियतकालिक आढावा घेणे तसेच संगणकीकरणाशी संबंधित असलेले शासन निर्णय व प्रचलित कार्यपध्दती आणि प्रदान केलेले अधिकार यांचे पुनर्विलोकन करुन योग्य ती कार्यवाही प्रस्तावित करणे.

४. समितीला सल्ला देण्यासाठी आवश्यक असे प्रशासकीय व तांत्रिक कार्यगट व उप-समित्या गठित करणे. तसेच त्यांना सल्लामसलतीसाठी पाचारण करुन योग्य तो सल्ला मिळविणे.

५. वेगवेगळया विभागांमध्ये परस्परांशी संबंधित डाटाबेसेसमध्ये सुसूत्रता आणणे व अशा डाटाबेसेसच्या प्रमाणीकरणाबद्दल निर्णय घेणे.

६. संगणकीकरणासाठी विविध विभागांना आवश्यक असलेल्या विविध यंत्रसामुग्री / तांत्रिक प्रकारच्या सेवेसाठी दर अथवा शुल्क ठरविणे व अशा सेवा पुरविणाऱ्या संस्थांची मान्यताप्राप्त यादी तयार करणे.

सदर कार्यकारी समितीच्या बैठका दरमहा घेण्यात याव्यात, तर उच्चाधिकार समितीच्या बैठका दर तिमाहीस घेण्यात याव्यात. या उच्चाधिकार समितीला कार्य-

कार्यकारी समितीतील अशासकीय सदस्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रवास-१४८८/प्र.क्र. ८५/सेवा-५, दिनांक १४ मार्च, १९८८ अन्वये प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता, तर वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः मुंविनि-१०९५/प्र.क्र. १२/विनियम, दि. १५ जून, १९८५ अन्वये बैठक भत्ता व वाहन खर्चाची प्रतिपूर्ती देय राहील.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने, त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-१५६६/९८/व्यय-४, दि. ११ नोव्हेंबर, १९९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राधेश्याम मोपलवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
● प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
● प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
● प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
● सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
● सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई.
● सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/लेखाकोष भवन, बांद्रे (पूर्व), मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).

● पत्राने.

एच-1149(4,500-1-99)2अ GR-1002041715321400-0104